केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (पुर्वीची इंदिरा आवास योजना ) करिता सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र शासनाकडून प्राप्त केंद्र हिस्स्याचा निधी सन २०१७-१८मधील अर्थसंकल्पित निधीतून वितरणास व खर्च करण्यास मान्यता. (लेखाशिर्ष २५०५ २९९२ )

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१७ / प्र. क्र.२३ / कार्यासन.६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - ०४ सप्टेंबर, २०१७.

वाचा -

१) वि. वि, शासन परिपत्रक ,क्रमांकः अर्थसं-२०१७ /प्र.क्र.६८ / अर्थ-३, दि. ०१.०४.२०१७.
२) वि. वि, शासन परिपत्रक, क्रमांकः अर्थसं-२०१७ /प्र.क्र.७५ / अर्थ-३, दि. १८.०४.२०१७.
३) वि. वि, शासन परिपत्रक, क्रमांकः अर्थसं-२०१७ /प्र.क्र.९४ / अर्थ-३, दि. ३०.०६.२०१७.
४) केंद्र शासन,ग्राम विकास मंत्रालयाचे पत्र क्र.J-१२०२५/०१/२०१६-RH(A/C)-२/B-Maharashtra, दि.३१.०३.२०१७ व दि.२६.०४.२०१७.
५) ग्राम विकास व जलसंधारण विभागाची नस्ती क्र.प्रआयो- २०१७ / प्र.क्र.१५७ /यो-१०.

## शासन निर्णय:-

केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (पुर्वीची इंदिरा आवास योजना ) करिता आदिवासी उपयोजनेंतर्गत सन २०१७-१८ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र हिस्स्याकरीता मागणी क्र.टी-५, २५०५-ग्रामीण रोजगार, ६०-इतर कार्यक्रम, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०५) प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण ) (केंद्र हिस्सा) (२५०५ २९९२), ३३-अर्थसहाय्य या लेखाशीर्षाखाली रू.४२६५९.७६ लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

केंद्र शासनाने सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) या योजनेंतर्गत् रु.६३८५.७२२ लाख इतका निधी वितरीत केला आहे. त्यानुषंगाने ग्राम विकास विभागाच्या उपरोक्त वाचा क्र.५ येथील नस्तीमध्ये प्रस्तावित केल्यानुसार सन २०१७-१८ या आर्थिक वर्षामध्ये प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (पुर्वीची इंदिरा आवास योजना ) या योजनेकरीता मागणी क्र.टी-५, २५०५-ग्रामीण रोजगार, ६०-इतर कार्यक्रम, ७९६-जनजाती क्षेत्र उपयोजना, (०१) (०५)-प्रधानमंत्री आवास योजना (ग्रामीण) (केंद्र हिस्सा) (२५०५ २९९२), ३३-अर्थसहाय्य सदर योजनेकरीता अर्थसंकल्पित रू. ४२६५९.७६ लाख इतक्या निधीतून सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरीता प्राप्त झालेला रू. ६३८५.७२२ लाख (अक्षरी रूपये त्रेसष्ठ कोटी पंच्याऐंशी लाख बहात्तर हजार दोनशे फक्त) इतका निधी प्रशासकीय विभाग/ नियंत्रक अधिकारी म्हणून सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई यांना अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यास व खर्च करण्यास खालीलप्रमाणे अटींच्या अधीन राहून या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

## अटी व शर्ती:-

१) उपरोक्त प्रमाणे वितरीत केलेला निधी या प्रकल्पाच्या मंजूर प्रशासकीय मान्यता रक्कमेच्या मर्यादेतच खर्च करण्याची तसेच त्याअनुषंगाने निधी खर्च करण्यासंबंधींच्या नियमांचे पालन करण्याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.

२) नियंत्रक अधिकारी/ विभागप्रमुख यांनी ही तरतूद शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, क्र.टिएसपी-१०८६/ ८७१०/प्र.क्र.३१/ का-५, दि.९.०३.१९९० अन्वये निश्चित केलेल्या आदिवासी उपयोजना क्षेत्र व क्षेत्राबाहेरील मान्य योजनांवर खर्च होतील याची दक्षता घ्यावी.

३) या तरतूदी खर्च करतांना शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग,क्र.टिएसपी-२००३/ प्र.क्र.१०१/का-६, दि.२६.०७.२००४ व टिएसपी-२००५/ प्र.क्र.५९/का-६,दि.१०.११.२००५ मधील अटींचे कटाक्षाने पालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

४) या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेल्या तरतूदी मासिक खर्च विवरणपत्राप्रमाणे खर्च करण्याची दक्षता सर्व नियंत्रक अधिकाऱ्यांनी घ्यावी.

५) आदिवासी उपयोजनेंतर्गत उपलब्ध करून दिलेली तरतूद फक्त आदिवासी लोकांकरीता वा आदिवासी उपयोजना क्षेत्रांतर्गतच खर्च करण्यात यावी. तसेच आदिवासी उपयोजना क्षेत्राबाहेरील क्षेत्रासाठी केलेली तरतूद त्या क्षेत्रातील आदिवासींकरीताच खर्च करण्यात यावी. आदिवासी उपयोजनेंतर्गत केलेली तरतूद आदिवासी क्षेत्राबाहेर किंवा सर्वसाधारण योजनेखाली खर्च करण्यात येऊ नये.

६) नियंत्रक अधिकारी/ विभागप्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात अतिरिक्त आदिवासी उपयोजना क्षेत्रात तसेच आदिवासी उपयोजनेक्षेत्राबाहेरील योजनांवर केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी.

७) खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखडयानुसार याच वर्षात सदरचा निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी.

८) उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय/ उपलेखाशिर्षनिहाय तसेच साध्य झालेले भौतिक उद्दिष्टनिहाय माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र, संबंधित क्षेत्रिय अधिकारी यांनी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक; संबंधित अपर आयुक्त, आदिवासी विकास; आदिवासी विकास विभाग व ग्राम विकास व जलसंधारण विभाग यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवणेबाबत सूचना देण्यात यावी.

९) वित्त विभागाच्या उक्त वाचा क्रमांक १,२ व ३ येथील परिपत्रकांतील सूचनांचे पालन करण्यात यावे.

सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा येथील क्र.१ येथील परिपत्रकान्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारात आणि वित्त विभाग, अनौपचारिक संदर्भ क्र.१११/ अर्थ-१९, दि.१४.०७.२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०९०४१४३८५१५७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Kiran Kisanrao Pawar

Digitally signed by Kiran Kisanrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Tribal Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, serialNumber=344de3ff07b9439dd11caf728255a5eb0a0dd495ef82f989931088637d8211c0, cn=Kiran Kisanrao Pawar
Date: 2017.09.04 17:46:44 +05'30'

**किरण कि. पवार**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सचिव, ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.

२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

३. अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक / नागपूर / ठाणे / अमरावती.

४. विभागीय आयुक्त, मुंबई/ नागपूर/ औरंगाबाद/ नाशिक/अमरावती/ पुणे.

५. वित्त विभाग ( अर्थसंकल्प- १९ ), मंत्रालय, मुंबई.

६. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा मजला, विधानभवन, मुंबई.

७. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.

८. कार्यासन-१७, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

९. निवड नस्ती (का.६).